आरोपींना जामिनावर सोडण्यापूर्वी त्यांचे छायाचित्र घेण्याबाबत व त्यांच्या पत्त्यांची खात्री करुन घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

परिपत्रक क्रमांक: सीआरटी ०४०३/३६४/पोल-११

मंत्रालय, मुंबई-३२, दिनांक : २१ एप्रिल, २००५

**परिपत्रक** :- मा.उच्च न्यायालयाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार जामीन मंजूर झालेल्या परंतु फरारी असलेल्या आरोपींना अटक करण्याविषयी नेमलेल्या उच्चस्तरीय समितीच्या शिफारशी व त्या शिफारशी बाबत उच्च न्यायालयाने नमूद केलेले आदेश विचारात घेवून क्रिमिनल मॅन्यूअलमध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

२. समितीच्या शिफारशी विचारात घेवून उच्च न्यायालयने दिलेल्या निदेशानुसार आरोपीस जामिनावर सोडतांना त्या आरोपीचे छायाचित्र घेण्यात यावे व त्याने दिलेला पत्ता तपासून पहावा. अज्ञात आरोपीच्या बाबतीत ओळख परेड झाल्यावर असे छायाचित्र घेण्यात यावे. आरोपीने दिलेल्या पत्त्याबाबत पोलीस अधिकाऱ्यास संशय असेल तर ती बाब त्याने संबंधित न्यायालयाच्या निदर्शनास आणून दयावी. संबंधीत न्यायालय आरोपीच्या जामिनदाराकडून आरोपीचा सध्याचा बिनचुक पत्ता प्राप्त करुन घेईल व त्या पत्त्याची खात्री करुन घेवूनच आरोपीला जामिनावर सोडण्यात यावे.

३. सर्व संबंधित पोलीस घटक प्रमुखांना याद्वारे सुचित करण्यात येते की, त्यांच्या अधिकारक्षेत्रातील सर्व पोलीस ठाणे प्रमुखांच्या निदर्शनास उपरोक्त सुचना आणून दयाव्यात. सदर निर्देशांचे पालन करण्यात कसुरी करणाऱ्या दोषी अधिकाऱ्यांवर शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल याचीही जाणीव संबंधितांना देण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(दि. ल. राशिवडे)

कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३) अपर पोलीस महासंचालक, रा.गु.अ.वि. महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) सर्व परिक्षेत्रीय पोलीस महानिरीक्षक.
५) सर्व पोलीस आयुक्त.
६) सर्व पोलीस अधिक्षक.
७) प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद खंडपीठ.
८) सर्व प्रबंधक, जिल्हा न्यायालये.